**मा. मुंबई उच्च न्यायालय व त्याची नागपूर, औरंगाबाद खंडपीठे याठिकाणी ई-फायलिंग व अनुषंगिक तांत्रिक स्वरुपाची कामे करण्याकरिता ५० कर्मचाऱ्यांच्या बाहययंत्रणेव्दारे घेतलेल्या सेवेस मुदतवाढ देणेबाबत.**

# महाराष्ट्र शासन

## विधी व न्याय विभाग

## शासन निर्णय क्रमांकः पदनि-५२२२/३९३/प्र.क्र. ८८/का.४

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
तारीख: १७ फेब्रुवारी, २०२५.

**संदर्भ -**

१. शासन निर्णय, विधी व न्याय विभाग क्र. पदनि ५२२२/३९३/प्र.क्र.८८/का.४, दि. २०/०४/२०२३.
२. केंद्रीय प्रकल्प समन्वयक, ई-कोर्ट प्रोजेक्ट, अपील शाखा, मुंबई उच्च न्यायालय यांची पत्रे क्र. Com/Sec/२२९/२०२४,दि. २१/१२/२०२४,
३. उच्चस्तरीय सचिव समितीची दि. १७/०२/२०२५ रोजीची मान्यता.

**प्रस्तावना -**

मा. मुंबई उच्च न्यायालय व त्याची नागपूर आणि औरंगाबाद खंडपीठे याठिकाणी ई-फायलिंग व अनुषंगिक तांत्रिक स्वरुपाची कुशल कामे करण्याकरिता ५० मनुष्यबळांच्या सेवा बाह्ययंत्रणेद्वारे घेण्यास संदर्भाधीन क्र. १ येथील शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात आली होती. संदर्भाधीन क्र. २ येथील पत्रान्वये उच्च न्यायालय प्रशासनाने मा. मुंबई उच्च न्यायालय व त्याची नागपूर आणि औरंगाबाद खंडपीठे याठिकाणी ई-फायलिंग व अनुषंगिक तांत्रिक स्वरुपाची कुशल कामे करण्याकरिता बाहययंत्रणेव्दारे घेतलेल्या ५० मनुष्यबळाच्या सेवेस पुढील ११ महिन्यांच्या कालावधीसाठी मुदतवाढ देण्यास व त्याकरीता येणाऱ्या रु.१,७९,०२,३७३/- इतक्या खर्चास मान्यता देण्याचा प्रस्ताव सादर केला होता. सदर प्रस्ताव उच्चस्तरीय सचिव समितीस चक्रीय पध्दतीने मान्यतेसाठी सादर करण्यात आला होता. सदर प्रस्तावास उच्चस्तरीय समितीची दि. १७/०२/२०२५ रोजी मान्यता प्राप्त झाली आहे. प्रस्तावास मुदतवाढ देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. त्यास अनुसरुन शासन पुढीलप्रमाणे निर्णय घेत आहे.

**शासन निर्णय -**

मा. मुंबई उच्च न्यायालय व त्याची नागपूर आणि औरंगाबाद खंडपीठे याठिकाणी ई-फायलिंग व अनुषंगिक तांत्रिक स्वरुपाची कुशल कामे बाहययंत्रणेव्दारे करण्याकरिता घेतलेल्या ५० मनुष्यबळाच्या सेवेस पुर्वीच्या सेवा समाप्त झाल्यादिनांकापासून पुढील ११ महिन्यांच्या कालावधीसाठी मुदतवाढ देण्यास व त्याकरीता येणाऱ्या रु.१,७९,०२,३७३/- इतक्या खर्चास याअन्वये शासन मान्यता प्रदान करण्यात येत आहे.

२. याअनुषंगाने बाहययंत्रणेव्दारे सेवा घेताना, वित्त विभागाने बाह्ययंत्रणेद्वारे सेवा घेण्यासाठी नेमून दिलेल्या विहित कार्यपध्दतीचा अवलंब करण्यात यावा.

३. तसेच बाहययंत्रणेव्दारे घेण्यात येणा-या सदरहू मनुष्यबळाच्या सेवांची मुदत ही पुर्वीच्या सेवा समाप्त झाल्यापासून पुढील ११ महिन्यांच्या कालावधीकरिता असेल, तद्नंतर ही मुदत आपोआप संपुष्टात येईल. तसेच संबंधित मनुष्यबळाचे कोणतेही उत्तरदायित्व शासनावर राहणार नाही.

४. याप्रित्यर्थ होणारा खर्च मुळ शाखेकरिता "मागणी क्र. जे -१, २०१४ - न्यायदान, (भारित) १०२-उच्च न्यायालये, (०२) (०१) प्रबंधक, मूळ शाखा, (२०१४ ००७४) (अनिवार्य) १० कंत्राटी सेवा" व अपील शाखा, खंडपीठ नागपूर व औरंगाबाद करिता "मागणी क्र. जे -१, २०१४ - न्यायदान, (भारित) १०२-उच्च न्यायालये, (०३) (०१) प्रबंधक, अपील शाखा, (२०१४ ००९२) (अनिवार्य) १० कंत्राटी सेवा" या लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा व तो सन २०२५-२६ या वित्तीय वर्षाच्या मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा.

५. सदर शासन निर्णय उच्चस्तरीय सचिव समितीच्या दि. १७/०२/२०२५ रोजीच्या मान्यतेस अनुसरुन तथा सक्षम प्राधिकाऱ्यांच्या मान्यतेने निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२५०२१७१८२०५८४९१२ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

VILAS VASANT GAIKWAD

Digitally signed by VILAS VASANT GAIKWAD
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=LAW AND JUDICIARY DEPARTMENT,
2.5.4.20=64f5ab9e019c90ad5db684984df113ed09062245cb9e042be5b12e5aa482fc17, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=CD7BB8BAA2D72280DD453A12422482D4768A126C83ECB44E84A8186EED4352A0, cn=VILAS VASANT GAIKWAD
Date: 2025.02.17 18:28:11 +05'30'

**( विलास व. गायकवाड )**
**विधि सल्लागार-नि-सह सचिव,महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. महाप्रबंधक,उच्च न्यायालय ,मुंबई, मुंबई.
२. प्रबंधक, मूळ शाखा, उच्च न्यायालय, मुंबई, मुंबई.
३. प्रबंधक (वित्त व अर्थसंकल्प) , अपील शाखा, उच्च न्यायालय, मुंबई, मुंबई.
४. प्रबंधक (प्रशासन), उच्च न्यायालय, मुंबई, खंडपीठ नागपूर, नागपूर.
५. प्रबंधक (प्रशासन), उच्च न्यायालय, मुंबई, खंडपीठ औरंगाबाद, औरंगाबाद.
६. केंद्रीय प्रकल्प समन्वयक, ई-कोर्ट प्रोजेक्ट, अपील शाखा, उच्च न्यायालय, मुंबई, मुंबई.
७. महालेखापाल (लेखापरीक्षा व लेखा अनुज्ञेयता),महाराष्ट्र-एक,मुंबई.
८. महालेखापाल (लेखापरीक्षा व लेखा अनुज्ञेयता),महाराष्ट्र-दोन,नागपूर.
९. अधिदान व लेखा अधिकारी,मुंबई.
१०.जिल्हा कोषागार अधिकारी, नागपूर/औरंगाबाद.
११.निवासी लेखा परीक्षा अधिकारी,मुंबई.
१२.वित्त विभाग, व्यय ५, मंत्रालय, मुंबई.
१३.कार्यासन अधिकारी, का.२३/२४, विधि व न्याय विभाग, मंत्रालय, मुंबई.
१४.निवड नस्ती.